**सन २०१८, खरीप हंगामात शासनाने दुष्काळ जाहीर केलेल्या भागात जनावरांच्या चारा छावण्यांची विभागीय आयुक्त, नाशिक (माहे जुलै व ऑगस्ट, २०१९ ची देयके) अदा करण्याकरीता लेखाशीर्ष (२२४५२१४९) अंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-०४/२०१९/प्र.क.२६(भाग-१)/म-११,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक:- २१ डिसेंबर, २०१९.

वाचा:-

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि.२५/०१/२०१९.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि. १३/०२/२०१९.
३) महसूल व वन विभाग, शासन पत्र, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि.०८/०३/२०१९.
४) महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.१२६/म-७, दि.२२/०३/२०१९.
५) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि.०४/०५/२०१९.
६) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एससीवाय-०४/२०१९/प्र.क.२६/म-११, दि.०३/०५/२०१९,दि.११/६/२०१९,दि.२४/०६/२०१९,दि.०५/०७/२०१९ व दि.०६/०९/२०१९.
७) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र. एससीवाय-२०१९/प्र.क्र.३०/म-७, दि.१६/०५/२०१९.
८) विभागीय आयुक्त, नाशिक,यांचे पत्र क्र. निधीमा/२०१८/प्र.क्र.-४४/तामे २३(४)जा.क्र.१६२९३/ दिनांक०६/१२/२०१९ व जा.क्र.१६८४३/,दिनांक १८/१२/२०१९.
९) महसूल व वन विभाग,पुनर्वि-२०१९/२२४५/प्र.क्र.८४/ब-१, दिनांक १६/११/२०१९.

प्रस्तावना :-

सन २०१८ च्या खरीप हंगामात राज्यातील जिल्हयांमध्ये सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झालेले असल्याने, शासनाने राज्यातील २६ जिल्हयांमध्ये १५१ तालुक्यात, या १५१ तालुक्यांव्यतिरिक्त २६८ महसुली मंडळामध्ये दुष्काळ तसेच, या क्षेत्राव्यतिरिक्त राज्यातील ९३१ गावांमध्ये दुष्काळसदृश्य परिस्थिती घोषित केलेली आहे. दुष्काळग्रस्त भागातील जनावरांना आवश्यक असलेल्या चाऱ्याच्या प्रश्नावर मात करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांसदर्भात दिनांक २४/०१/२०१९ रोजी पार पडलेल्या मंत्रिमंडळ उपसमितीच्या बैठकीत, राज्यातील दुष्काळी भागात आवश्यकतेनुसार जनावरांना चारा व पाणी उपलब्ध करून देण्यासाठी जनावरांच्या छावण्या उघडण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानुसार विभागीय आयुक्त, नाशिक यांनी मागणी केल्यानुसार जनावरांच्या चारा छावण्यांची देयके अदा करण्यासाठी आतापर्यंत लेखाशीर्ष (२२४५ २१४९) या लेखाशीर्षांतर्गत अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे रुपये ५८,९४,०६,०००/- इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

उपरोक्त संदर्भ क्र. ०७ येथील दिनांक १६/०५/२०१९ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे मोठे जनावरांसाठी रुपये १००/- प्रतिदिन व छोटे जनावरांसाठी रुपये ५०/- प्रतिदिन असा दर दिनांक १६/०५/२०१९ पासून अनुज्ञेय असल्यामुळे या दरवाढीमूळे मोठया जनावरांसाठी होणारा वाढीव खर्च रुपये ३० प्रतिदिन व लहान जनावरांसाठी रुपये १५/- प्रतिदिन हा खर्च लेखाशीर्ष (२२४५ २१४९) या लेखाशीर्षातून खर्च करण्यासाठी प्रशासकीय मान्यता दिली आहे. त्यानुसार विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक यांनी उपरोक्त संदर्भ क्र.०८ अन्वये वाढीव खर्चासाठी निधीची मागणी केली आहे. लेखाशीर्ष क्र.(२२४५ २१४९) अंतर्गत एकूण

रुपये १७,१६,५९,०००/- इतका पुनर्विनियोजनाने प्राप्त निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (BEAMS) द्वारे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नाशिक विभागातील टंचाईग्रस्त भागात आवश्यकतेनुसार उघडण्यात आलेल्या जनावरांच्या चारा छावण्यांची देयके अदा करण्यासाठी विभागीय आयुक्त, नाशिक यांनी मागणीप्रमाणे लेखाशीर्ष (२२४५ २१४९) अंतर्गत एकूण **रुपये १७,१६,५९,०००/-(अक्षरी रुपये सतरा कोटी सोळा लक्ष एकोणसाठ हजार फक्त)** इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०१९-२० या चालू वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र.सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, (९२) (०७) वैरण पुरवठा (अनिवार्य) ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ २१४९) या लेखाशिर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून रुपये १७,१६,५९,०००/-(अक्षरी रुपये सतरा कोटी सोळा लक्ष एकोणसाठ हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय प्रणाली (BEAMS) द्वारे उपलब्ध करून देण्यात येत आहे. सदर निधी विभागीय आयुक्त, नाशिक यांनी तात्काळ संबंधित जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा.

३. सदर निधी मिळाल्यापासून चारा छावणी देयकांच्या अदायगीचे काम त्वरीत पूर्ण करावे, चारा छावणीबाबत उपरोक्त संदर्भीय शासन निर्णय दिनांक २५/०१/२०१९, दिनांक १३/०२/२०१९, दिनांक शासन परिपत्रक दिनांक २२/०३/२०१९, शासन पत्र क्रमांक दिनांक ०८/०३/२०१९, शा.नि. दिनांक ०४/०५/२०१९ व शा.नि. दिनांक १६/०५/२०१९ मध्ये नमूद निकष, विहित अटी व शर्ती व त्यामधील सूचनांप्रमाणे कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी.

४. वितरीत निधी स्वीय प्रपंजी लेखा खाते (Personal Ledger Account) अथवा बँक खात्यात न ठेवता तो छावणी प्रायोजक संस्था यांना थेट Electronic Clearing Services द्वारे वितरीत केला जाईल, या अटींच्या अधिन निधी वितरीत करण्यात येत आहे. तरी त्यानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांनी कार्यवाही करावी.

५. विभागीय आयुक्त, नाशिक यांनी संबंधितांना निधी वितरीत केल्यानंतरच एकूण वितरीत निधीच्या ७५% रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच यापुढील निधी मागणीबाबत कार्यवाही करावी.

६. सदर निधीचे वाटप अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर विभागीय आयुक्त, नाशिक यांना करण्यात येत आहे. निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची संबंधित विभागीय आयुक्त यांनी खातरजमा करावी. तसेच निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेखे / नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरित व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अदयावत ठेवण्यात याव्यात. तसेच झालेल्या खर्चाचा कोषागार कार्यालय व महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी त्रैमासिक ताळमेळ घेऊन त्याबाबतचे **उपयोगिता प्रमाणपत्र** या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी. वितरीत करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करावी.

७. नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत मा. सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार यांच्याकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या संगणक चिठ्ठीमध्ये गौण/उपशिर्षाच्या संगणक संकेतांकाचा न चुकता

उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी दयावेत. तसेच कोषागारातून/ उपकोषागारातून आहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९१२२११४३०१४५७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mrs Prachi Subhash Palav

Digitally signed by Mrs Prachi Subhash Palav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forests Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=24f50ef265746804647bc2fbe93baa4f4946b70001f4dae8b4d99df442e31c92, serialNumber=5479aef7e1148d256d58123c94081f8b8c9af5cfce5aaf933dfa4dc33e2de372, cn=Mrs Prachi Subhash Palav
Date: 2019.12.21 15:02:53 +05'30'

**( प्राची सुभाष पालव )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) मा. मंत्री, (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
२) मा. सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, नाशिक.
४) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर ( ३ प्रती).
५) संबंधित जिल्हाधिकारी,
६) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य.
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
८) वित्त विभाग (अर्थसंकल्प-६/व्यय-९), मंत्रालय, मुंबई,
९) कार्यासन अधिकारी (म-७), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती, (कार्यासन म-११).